महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळाच्या बस प्रवास भाड्यात विविध सामाजिक घटकांनी दिलेल्या प्रवास सवलत योजनांमध्ये सुधारणा करण्याबाबत...

# महाराष्ट्र शासन

## गृह विभाग

**शासन निर्णय क्र.एसटीसी-१०१७/प्र.क्र.५२५/परि-१**

गृह विभाग, मंत्रालय, मुंबई - **४०० ०३२.**

दिनांक : ०९ ऑक्टोबर, २०१८.

**वाचा :-**

१. शासन निर्णय गृह विभाग क्र.एसटीसी-३४००/६३१/सीआर-३१/परि-१, दि. २०.०६.२०००.
२. शासन निर्णय गृह विभाग क्र.एसटीसी-३४०१/सीआर-४२/भाग-१/परि-१,दि. ०५.१२.२००५.
३. शासन निर्णय गृह विभाग क्र.एसटीसी-३४०५/प्र.क्र.५१५/परि-१, दि.२६.०७.२००६.
४. शासन निर्णय गृह विभाग क्र.एसटीसी-०११३/प्र.क्र.१०३/परि-१, दि.१०.०२.२०१४.
५. मा.मंत्री (वित्त) यांचे अ.शा.पत्र क्र.संकिर्ण २०१४ /प्र.क्र.५२/अर्थबळ, दि.२८/७/२०१५.
६. शासन निर्णय गृह विभाग क्र.एसटीसी-०८१५/प्र.क्र.५५०/परि-१, दि.२५.०२.२०१६.
७. शासन निर्णय गृह विभाग क्र.एसटीसी-०२१६/प्र.क्र.७०/परि-१, दि.०३.०५.२०१६.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळाद्वारा राज्यातील जनतेस मुख्यत: ग्रामीण भागात नियमित प्रवासी वाहतुकीची सेवा देण्यात येत असून राज्य शासनाने वेळोवळी दिलेल्या आदेशानुसार महामंडळाकडून विविध प्रवासी वर्गाला प्रवासी भाडयात सवलती देण्यात आलेल्या आहेत. सदर प्रवास सवलत योजनांचा आर्थिक खर्च सुरुवातीस राज्य परिवहन महामंडळाव्दारा करण्यात येत होता. त्यानंतर प्रवासी सवलत योजनांवरील खर्चाच्या रक्कमेत मोठया प्रमाणात वाढ झाल्याने सन १९९७-९८ पासून विविध प्रवासी सवलत योजनांवरील खर्चाची प्रतिपूर्ती शासनामार्फत करण्यास सुरुवात झाली, त्यावेळी सदर खर्चाची प्रतिपूर्ती गृह (परिवहन) विभागामार्फत करण्यात येत होती. तद्नंतर दिनांक ५ डिसेंबर, २००५ चे शासन निर्णयान्वये राज्य मार्ग परिवहन महामंडळाच्या बसप्रवास भाडयात विविध सामाजिक घटकांना दिलेल्या प्रवास सवलत मूल्याची प्रतिपूर्ती संबंधित विभागांनी करण्याचा निर्णय घेण्यात आला. तथापि सदर निर्णयात बदल करुन पूर्वीप्रमाणेच गृह (परिवहन) विभागामार्फत प्राप्त करातून पुस्तकी समायोजनाव्दारे राज्य मार्ग परिवहन महामंडळास प्रवास सवलत मूल्याची रक्कम देण्याचा निर्णय दि.२६/०७/२००६ च्या शासन निर्णयान्वये घेण्यात आला आणि तेव्हापासून सदर निर्णयाप्रमाणे महामंडळास प्रवास सवलत मुल्याची रक्कम अदा करण्यात येत होती. तद्नंतर दि.१०/०२/२०१४ च्या शासन निर्णयान्वये दि. ०१ एप्रिल, २०१४ पासून प्रवास सवलत मुल्याची प्रतिपूर्ती सवलत देणाऱ्या संबंधित प्रशासकीय विभागांनी करावी. तसेच एखादया प्रवास सवलत योजनेमध्ये फेरफार करणे, सुधारणा करणे, योजना बंद करणे अथवा नविन प्रवास सवलत योजना सुरु करण्याचा धोरणात्मक निर्णय संबंधित प्रशासकीय विभागाने घ्यावा, असा निर्णय घेण्यात आला होता. तथापि, सदर आदेशानुसार दि.१ एप्रिल, २०१४ पासून संबंधित प्रशासकीय विभाग हे राज्य मार्ग परिवहन

महामंडळास प्रवास सवलत मूल्याची प्रतिपूर्ती करु न शकल्याने अशा योजनांबाबतचे अधिकार गृह (परिवहन) विभागास देण्याचा निर्णय संदर्भाधिन क्र.६ येथील दि.२५/२/२०१६ च्या शासन निर्णयान्वये घेण्यात आलेला आहे.

महाराष्ट्र राज्याच्या वित्तीय स्थितीच्या श्वेतपत्रिकेत एस.टी.प्रवास खर्चावरील सवलतीसंदर्भात निकष व पध्दती यांचे पुनर्विलोकन करण्याची संदर्भाधिन क्र.५ येथील मा.मंत्री, वित्त आणि नियोजन, वने यांच्या दि.२८/७/२०१५ च्या पत्रामध्ये आवश्यकता नमूद असून त्यानुसार शासनाव्दारे राज्य मार्ग परिवहन महामंडळाच्या बसप्रवास भाडयात विविध सामाजिक घटकांना देण्यात येणाऱ्या सर्व प्रवास सवलत योजनांचा आढावा घेवून त्यामध्ये सुधारणा करण्याची कार्यवाही करण्याकरीता दि.०३.०५.२०१६ च्या शासन निर्णयानुसार तज्ञ समिती नियुक्त करण्यात आली होती. सदर समितीचा अहवाल विचारात घेऊन विविध प्रवास सवलत योजनांमध्ये खालीलप्रमाणे सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

## शासन निर्णय :-

महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळाच्या विविध प्रवास सवलत मुल्यांच्या योजनांमध्ये खालीलप्रमाणे सुधारणा करण्यास तसेच नवीन योजना सुरु करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

| अ. क्र. | योजनेचे नाव व लाभार्थी निकष | सद्याची सवलतीची टक्केवारी | योजनेमधील सुधारणा खालीलप्रमाणे राहील | सुधारित सवलतीची टक्केवारी |
|---|---|---|---|---|
| १ | अहिल्याबाई होळकर योजना- ग्रामीण भागातील ५ वी ते १० पर्यंत शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थीनींना शाळेत जाण्यासाठी एस.टी.ने मोफत प्रवास योजना. | १०० % सवलत | सदरची योजना १२ वी पर्यंत विद्यार्थ्यांनींकरीता राबविण्यास मान्यता देण्यात येत आहे. | पुर्वीप्रमाणे १००% सवलत |
| २ | विद्यार्थी (शैक्षणिक) मासिक पास- १९८६ पूर्वी सुरु केलेल्या अभ्यासक्रमांना ज्यांची परिक्षा माध्यमिक शालांत परीक्षा मंडळ/ उच्च माध्यमिक शालांत परीक्षा मंडळ, विद्यापीठ घेते असे शासनमान्य शैक्षणिक संस्थांमध्ये शिक्षण घेणारे विद्यार्थी. | ६६.६७% सवलत | १९८६ नंतर सुरु झालेले विविध अभ्यासक्रम समाविष्ट करण्यास मान्यता देण्यात येत आहे. | पुर्वीप्रमाणे ६६.६७% सवलत |
| ३ | विद्यार्थी (तंत्र व व्यावसायिक शिक्षण) मासिक पास- १९८६ पूर्वी सुरु केलेल्या अभ्यासक्रमांना ज्यांची परिक्षा तंत्र शिक्षण परिक्षा मंडळ इ. मार्फत घेतली जाते अश्या शैक्षणिक संस्थांमधील विद्यार्थी. | ६६.६७% सवलत | १९८६ नंतर सुरु झालेले विविध अभ्यासक्रम समाविष्ट करण्यास मान्यता देण्यात येत आहे. | पुर्वीप्रमाणे ६६.६७% सवलत |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ४ | अर्जून, द्रोणाचार्य, शिवछत्रपती व दादाजी कोंडदेव पुरस्कारप्राप्त व्यक्ती - सर्वसाधारण, निम-आराम व आराम बस मध्ये वर्षभर विनामुल्य प्रवास सवलत आहे. शासनाकडून प्रतिलाभार्थी रु.५००/- प्रतिपूर्ती करण्यात येते. | १०० % सवलत | राष्ट्रीय स्तरावरील पुरस्कार्थींना वातानुकूलित बससेवा समाविष्ट करावी. लाभार्थींना स्मार्टकार्ड देवून प्रत्यक्ष प्रवास केलेल्या प्रवास मुल्याचे प्रतिपूर्ती करावी. स्मार्टकार्ड व्यवस्था होईपर्यंत प्रतिलाभार्थी रु.२०००/- प्रमाणे प्रतिपूर्ती करण्यास मान्यता देण्यात येत आहे. | पुर्वीप्रमाणे १०० % सवलत |
| ५ | डॉ.बाबासाहेब आंबेडकर समाजभुषण पुरस्कार- सर्वसाधारण, निम-आराम व आराम बस मध्ये वर्षभर विनामुल्य प्रवास सवलत आहे. शासनाकडून प्रतिलाभार्थी रु.१०००/- प्रतिपूर्ती करण्यात येते. | १००% सवलत | लाभार्थींना स्मार्टकार्ड देवून प्रत्यक्ष प्रवास केलेल्या प्रवास मुल्याचे प्रतिपूर्ती करावी. कमाल प्रवास मर्यादा ८००० कि.मी. ठेवावी. स्मार्टकार्ड व्यवस्था होईपर्यंत प्रतिलाभार्थी रु.४०००/- प्रमाणे प्रतिपूर्ती करण्यास मान्यता देण्यात येत आहे. | पुर्वीप्रमाणे १००% सवलत |
| ६ | लोकशाहीर अण्णाभाऊ साठे पुरस्कार- सर्वसाधारण, निमआराम, आराम बसमध्ये राज्यांतर्गत वर्षभर विनामुल्य प्रवास सवलत. शासनाकडून प्रतिलाभार्थी रु.१०००/- प्रतिपूर्ती करण्यात येते. | १००% सवलत | लाभार्थींना आधारकार्ड संलग्न स्मार्टकार्ड देण्यात यावे जेणेकरून प्रत्यक्ष प्रवास केलेल्या प्रवासापोटी शासनाकडून प्रतिपूर्ती केली जाईल. प्रत्यक्ष प्रवास कमाल ८००० कि.मी. अंतर. स्मार्टकार्ड व्यवस्था होईपर्यंत प्रतिलाभार्थी रु.४०००/- प्रमाणे प्रतिपूर्ती करण्यास मान्यता देण्यात येत आहे. | पुर्वीप्रमाणे १००% सवलत |
| ७ | स्वातंत्र सैनिकांना देण्यात येणारी सवलत- सर्वसाधारण, निम-आराम, आराम बसमध्ये लाभार्थ्यांस त्याचे पती/पत्नीस वर्षभर विनामुल्य प्रवास सवलत शासनाकडून प्रतिलाभार्थी प्रतिवर्ष रु.१०००/- प्रतिपूर्ती करण्यात येते. | १००% सवलत | स्मार्टकार्ड द्यावे, स्मार्टकार्ड व्यवस्था होईपर्यंत ८००० कि.मी. चे प्रवासभाडे वातानुकूलित बसने प्रवास करीत असल्यास निमआराम बसपेक्षा अधिक प्रवास भाडे प्रवाशांनी भरून प्रवास करण्यास अनुमती द्यावी. शासनाकडून प्रतिलाभार्थी प्रतिवर्ष रु.४०००/- प्रमाणे प्रतिपूर्ती करण्यास मान्यता देण्यात येत आहे. | पुर्वीप्रमाणे १००% सवलत |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ८ | ६५ वर्षांवरील जेष्ठ नागरिकांना देण्यात येणारी सवलत- सर्वसाधारण व निम-आराम बसेस मध्ये ५०% सवलत राज्यांतर्गत प्रवास सवलत. वयाचा पुरावा म्हणुन तहसीलदार दाखला, पॅनकार्ड, ड्रायव्हींग लायसन्स, निवडणुक ओळखपत्र व इतर. | ५० % सवलत | प्रतिवर्ष कमाल ४००० कि.मी. अंतर. आधार कार्ड संलग्न स्मार्टकार्ड देणे. वयाचा पुरावा म्हणुन आधारकार्ड ग्राह्य धरला जावे. वातानुकूलित बसने (शिवशाही बस सोडून) प्रवास करीत असल्यास निमआराम / शिवशाही बसपेक्षा अधिक प्रवास भाडे प्रवाशांनी भरुन प्रवास करण्यास करण्यास मान्यता देण्यात येत आहे. | सर्वसाधारण व निमआराम बसेसमध्ये ५०% सवलत पुर्वीप्रमाणे तसेच, शिवशाही (आसनव्यवस्था) बसमध्ये ४५% सवलत अनुज्ञेय राहील. |
| ९ | क्षयरोगग्रस्त व्यक्तींना देण्यात सेणारी सवलत - वैद्यकिय प्रमाणपत्राच्या आधारे सर्वसाधारण बसने राज्यांतर्गत प्रवास सवलत. क्षयरोगग्रस्त व्यक्तींना अमर्याद अंतरापर्यंत प्रवास सवलत | ५०% सवलत | आधारकार्ड संलग्न स्मार्टकार्डची वैधता २ वर्ष द्यावी. क्षयरोग्यांना प्रमाणपत्रात नमुद कालावधीपर्यंतच सवलत अनुज्ञेय राहील. मात्र कमाल मर्यादा २ वर्षे राहील. प्रत्येक प्रवासाकरीता ५० कि.मी. प्रवास सवलत अनुज्ञेय राहील. ७५% प्रवास सवलत देण्यास मान्यता देण्यात येत आहे. | ७५% सवलत |
| १० | कुष्ठरोगग्रस्त व्यक्तींना देण्यात सेणारी सवलत- वैद्यकिय प्रमाणपत्राच्या आधारे सर्वसाधारण बसने राज्यांतर्गत प्रवास सवलत. कुष्ठरोगग्रस्त व्यक्तींना अमर्याद अंतरापर्यंत प्रवास सवलत. | ७५% सवलत | आधारकार्ड संलग्न स्मार्टकार्डची वैधता २ वर्ष द्यावी. प्रत्येक प्रवासाकरीता ५० कि.मी. प्रवास सवलत आणि २ वर्ष सवलतीचा कालावधी राहील. | पुर्वीप्रमाणे ७५ % सवलत |
| ११ | कर्करोगग्रस्त व्यक्तींना देण्यात सेणारी सवलत- वैद्यकिय प्रमाणपत्राच्या आधारे सर्वसाधारण बसने राज्यांतर्गत प्रवास सवलत. | ५०% सवलत | आधारकार्ड संलग्न स्मार्टकार्डची वैधता २ वर्ष द्यावी. प्रत्येक प्रवासाकरीता कमाल १५०० कि.मी. प्रवास सवलत आणि | ७५% सवलत |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | कर्करोगग्रस्त व्यक्तींना अमर्याद अंतरापर्यंत प्रवास सवलत. | | १ वर्ष सवलतीचा कालावधी राहील.<br>७५ % सवलत देण्यास मान्यता देण्यात येत आहे. | |
| १२ | सिकलसेल, हिमोफिलिया ग्रस्त रुग्णांना तसेच एचआयव्ही बाधित व डायलेसिस रुग्णांना देण्यात येणारी सवलत - | १००% सवलत | औषधोपचाराकरिता निवासी गावापासून ग्रामीण/ उपजिल्हा/ जिल्हा रुग्णालय व शासकीय वैद्यकीय महाविद्यालय /रुग्णालय येथे उपचाराकरिता प्रवास सवलत.<br>सिकलसेल ग्रस्त रुग्णांना १५० कि.मी., एचआयव्ही बाधित रुग्णांना ५० कि.मी., डायलेसिस रुग्णांना १०० कि.मी. प्रती प्रवास अशी अमर्याद कालावधीपर्यंत प्रवास सवलत तसेच हिमोफिलियाग्रस्त रुग्णांना सिकलसेलप्रमाणे प्रवास सवलत देण्यास मान्यता देण्यात येत आहे. | सिकलसेल, एचआयव्ही बाधित व डायलेसिस रुग्णांना पुर्वीप्रमाणे १००% सवलत, तसेच हिमोफिलिया ग्रस्त रुग्णांना १००% सवलत |
| १३ | राष्ट्रपिता महात्मा गांधी राज्यस्तरीय व्यसनमुक्ती सेवा पुरस्कार प्राप्त व्यक्ती यांस प्रवास भाड्यात सवलत. | १००% सवलत | आधार कार्ड संलग्न स्मार्टकार्ड देणे. प्रत्यक्ष प्रवास खर्चाची प्रतिपुर्ती. शासनाकडून प्रतिलाभार्थी रु.२०००/- प्रमाणे प्रतिपुर्ती. वातानुकूलित बसने प्रवास करीत असल्यास निमआराम बसपेक्षा अधिक प्रवासभाडे प्रवाशांनी भरून प्रवास करण्यास मान्यता देण्यात येत आहे.<br>कमाल मर्यादा १००० कि.मी. | पुर्वीप्रमाणे १००% सवलत |
| १४ | अंध तसेच अपंग व्यक्तींना देण्यात येणारी सवलत-<br>४०% पेक्षा जास्त अपंगत्व असणाऱ्या व्यक्तीस | ७५% सवलत | आधार कार्ड संलग्न स्मार्टकार्ड देणे. | पुर्वीप्रमाणे ७५ % सवलत |
| १५ | अंध तसेच अपंग व्यक्तींना देण्यात येणारी सवलत-<br>१०० % अपंगत्व अथवा पूर्णत: परावलंबी असणाऱ्या अंध व अपंग व्यक्तीच्या साथीदारास | ५०% सवलत | रेल्वेप्रमाणे ६५% किंवा अधिक अपंगत्व असणाऱ्या व्यक्तीच्या साथीदारास सवलत देण्यास मान्यता देण्यात येत आहे. | पुर्वीप्रमाणे ५०% सवलत |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| १६ | अधिस्विकृतीधारक पत्रकारांना प्रवास सवलत-<br>सर्वसाधारण व निमआराम बसमध्ये वर्षभर विनामुल्य प्रवास सवलत आहे. | १००% सवलत | आधार कार्ड संलग्न स्मार्टकार्ड देणे.<br>प्रत्यक्ष प्रवास भाडयाची प्रतिपूर्ती करावी.<br>स्मार्टकार्ड व्यवस्था होईपर्यंत ८००० कि.मी. चे प्रवासभाडे आकारावे. | शिवशाही (आसनी व शयनयान) बसेसमध्ये १०० टक्के सवलत. |
| १७ | आजी / माजी विधानमंडळ सदस्यांना साधी, निमआराम, आराम, शिवशाही व शिवनेरी बसमध्ये वर्षभर विनामुल्य प्रवास सवलत. | १००% सवलत | आधारकार्ड संलग्न स्मार्टकार्ड देणे. प्रत्यक्ष खर्चाची प्रतिपुर्ती करणे. सद्यस्थितीत प्रचलित पद्धतीने प्रतिपूर्ती करणे. प्रत्येक प्रकारच्या बसमधील राखीव आसने ही बस सुटण्याच्या ४८ तास अगोदरपर्यंत राखीव असावी. | पुर्वीप्रमाणे १००% सवलत |
| १८ | राज्य शासनाने पुरस्कृत केलेल्या खेळामध्ये भाग घेतलेले विजेते स्पर्धक | ३३.३३% सवलत | सदर योजना आहे त्या पध्दतीने यापुढेही चालू ठेवावी. | पुर्वीप्रमाणे ३३.३३% सवलत |
| १९ | विद्यार्थी जेवणाचे डब्बे | १०० % सवलत | सदर योजना आहे त्या पध्दतीने यापुढेही चालू ठेवावी. | पुर्वीप्रमाणे १००% सवलत |
| २० | विद्यार्थ्यांना मोठया सुट्टीत मूळ गावी जाणे, आजारी आई वडीलांना भेटणे, कँपला जाणे. (वसतीगृहात राहणारे विद्यार्थी या योजनेचे लाभार्थी असतात) | ५० % सवलत | सदर योजना आहे त्या पध्दतीने यापुढेही चालू ठेवावी. | पुर्वीप्रमाणे ५०% सवलत |
| २१ | विद्यार्थ्यांना नैमित्तिक करारावर देण्यात येणारी सवलत. (विद्यार्थी शैक्षणिक सहल) | ५०% सवलत | सदर योजना आहे त्या पध्दतीने यापुढेही चालू ठेवावी. | पुर्वीप्रमाणे ५०% सवलत |
| २२ | पंढरपूर आषाढी / कार्तिकी एकादशीला शासकीय पूजेचा मान मिळवलेल्या एका वारकरी दामत्यास वर्षासाठी रु.९०००/- पर्यंत मुल्याइतकी मोफत प्रवास सवलत. | १०० % सवलत | सदर योजना आहे त्या पध्दतीने यापुढेही चालू ठेवावी. | पुर्वीप्रमाणे १००% सवलत |
| २३ | रेस्कू होममधील मुलांना वर्षातून एकदा सहलीकरिता. | ६६.६७% सवलत | सदर योजना आहे त्या पध्दतीने यापुढेही चालू ठेवावी. | पुर्वीप्रमाणे ६६.६७% सवलत |
| २४ | मुंबई-पुनवर्सन केंद्रातील मानसिक दृष्टया अपंग विद्यार्थ्यांना सवलत | ६६.६७% सवलत | सदर योजना आहे त्या पध्दतीने यापुढेही चालू ठेवावी. | पुर्वीप्रमाणे ६६.६७% सवलत |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| २५ | अपंग गुणवंत कामगार पुरस्कार प्राप्त व्यक्ती व त्यांचे साथीदार | १००% सवलत | सदर योजना आहे त्या पध्दतीने यापुढेही चालू ठेवावी. | पुर्वीप्रमाणे १००% सवलत |
| २६ | आदिवासी पुरस्कार प्राप्त व्यक्ती व त्यांचे एक साथीदार यांना वर्षभर मोफत प्रवास सवलत. | १००% सवलत | सदर योजना आहे त्या पध्दतीने यापुढेही चालू ठेवावी. | पुर्वीप्रमाणे १००% सवलत |
| २७ | नवीन योजना - कौशल्य सेतु अभियान :- शालेय शिक्षण व क्रीडा विभागाने माध्यमिक शालांत परिक्षा (इ. १० वी) मध्ये अनुत्तिर्ण होणा-या विद्यार्थ्यांसाठी सुरु केलेल्या कौशल्य सेतु अभियान योजनेमध्ये १११ प्रशिक्षण केंद्रात घेणाऱ्या विद्यार्थ्यांना निवासस्थान ते प्रशिक्षण केंद्र या प्रवासासाठी ६६.६७ % टक्के मोफत प्रवास सवलत देण्यास मान्यता देण्यात येत आहे. | | | ६६.६७% सवलत |

२. वरील योजना चालू ठेवल्यामुळे राज्य शासनावर सध्या चालू असलेल्या योजनांचा वार्षिक आवर्ती खर्च रु. १३५९.२३ कोटी राहणार आहे. तसेच योजनांमधील सुधारणेमुळे तसेच नवीन योजनेमुळे रु. ३६.५७ कोटी एवढा अधिकचा वार्षिक आवर्ती खर्च करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे. यावरील खर्च मागणी क्र. बी-३ २०४१, वाहनांवरील कर, ००, ००१, संचालन व प्रशासन (०१) परिवहन आयुक्त (०१) (०१) आस्थापना - परिवहन आयुक्त (दत्तमत) (अनिवार्य) (२०४१ ००१८) ३३, अर्थसहाय्य यामधील तरतुदीमधून भागविण्यात येईल.

३. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१९६/१८/व्यय-८, दि.२०.०६.२०१८ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०१८१००४१५५९३९३९२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.**

Digitally signed by Meghana Gaurav Shinde
Date: 2018.10.09 17:59:32 +05'30'

**(मेघना गौरव शिंदे )**
**कार्यासन अधिकारी**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
३. सर्व मा.मंत्री / मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा.अध्यक्ष, विधानसभा यांचे खासगी सचिव, विधान भवन, मुंबई.
५. मा.सभापती, विधानपरिषद यांचे खासगी सचिव, विधान भवन, मुंबई.

६. मा.उपाध्यक्ष, विधानसभा यांचे खासगी सचिव, विधान भवन, मुंबई.
७. मा.उपसभापती, विधानपरिषद यांचे खासगी सचिव, विधान भवन, मुंबई.
८. मा.विरोधी पक्षनेता (विधानपरिषद) यांचे खासगी सचिव, विधान भवन, मुंबई.
९. मा.विरोधी पक्षनेता (विधानसभा) यांचे खासगी सचिव, विधान भवन, मुंबई.
१०.मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.
११.अपर मुख्य सचिव (वित्त विभाग), मंत्रालय, मुंबई.
१२.अपर मुख्य सचिव (नियोजन विभाग), मंत्रालय, मुंबई.
१३.प्रधान सचिव, शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४.प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५.प्रधान सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६.प्रधान सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७.प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१८. सचिव, सामान्य प्रशासन विभाग, (स्वातंत्र्य सैनिक), मंत्रालय, मुंबई.
१९.सचिव, सामान्य प्रशासन विभाग, (मा. व ज.), मंत्रालय, मुंबई.
२०.सचिव, आदिवासी विकास विभाग,मंत्रालय, मुंबई.
२१.सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव /सचिव, मंत्रालय, मुंबई.
२२.उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई.
२३.परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२४. महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षण), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
२५. महालेखापाल (वाणिज्यिक लेखा परिक्षा), मुंबई.
२६. प्रधानसचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुबई
२७.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
२८. आयुक्त, अपंग कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
२९.शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे
३०.निवासी लेखा परिक्षण अधिकारी, मुंबई.
३१.वित्तिय सल्लागार व मुख्य लेखा अधिकारी, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई.
३२.नियोजन विभाग कार्यासन १४६१, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
३३.वित्त विभाग (व्यय ८/साऊ/अर्थबळ/अर्थसंकल्प-१०/अर्थोपाय), मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
३४.गृह विभाग (बीयुडी-१/बीयुडी-२/परि ३/परि ४), मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
३५.संबधित मंत्रालयीन विभाग.
३६.निवडनस्ती/परिवहन-१.